**संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या अखत्यारीतील सहकारी सूत गिरण्यांसाठी निर्माण करण्यात आलेले विशेष लेखा परिक्षक वर्ग-१ हे एक अस्थायी पद सन २०१८-१९ या वर्षाकरीता पुढे चालू ठेवण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपदे २७१७/प्र.क्र.०७/टेक्स-१ (अ)**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०६ ऑक्टोबर, २०१८

वाचा :-

१. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांकः राजस १००३/प्र.क्र.४२/५-स/०३, दिनांक : १२ फेब्रुवारी, २००३
२. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,शासन निर्णय क्रमांकः राजस १००५/प्र.क्र.१८१/५-स, दिनांक : ३१ जानेवारी, २००६
३. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांकः राजस १००८/प्र.क्र.५३८/५-स, दिनांक : ५ मे, २०११
४. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांकः अपदे २७१७/प्र.क्र.०७/ टेक्स१ (अ), दिनांक : ३१ मार्च, २०१८
५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांचे पत्र क्र.आस्थापना/ कक्ष-४/वस्त्रो/अस्थायी पदे/मुदतवाढ/१०५९/२०१८, दिनांक ०१ सप्टेंबर, २०१८
६. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांकः पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७ सप्टेंबर, २०१८

प्रस्तावना :-

संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णय दि. ३१ मार्च, २०१८ अन्वये संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर यांचे संचालनालयात सहकारी सूत गिरण्यांसाठी निर्माण करण्यात आलेले विशेष लेखा परीक्षक वर्ग-१ (वेतन संरचना रु.१५६००-३९१००+ग्रेड वेतन ५४००) या १ अस्थायी पदास दिनांक १ मार्च, २०१८ ते दिनांक ३० सप्टेंबर, २०१८ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजूरी दिली होती. सदर १ अस्थायी पदास दिनांक १ ऑक्टोबर, २०१८ पासून दिनांक २८ फेब्रुवारी, २०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्र.३ येथील दि.५ मे, २०११ च्या शासन निर्णयानुसार या विभागातील स्थायी व अस्थायी पदांच्या आढाव्यानुसार ९३१९ पदांच्या आकृतीबंधास मंजूरी देण्यात आली आहे. त्यामध्ये प्रस्तुत विशेष लेखा परिक्षक वर्ग-१ (वेतन संरचना रु.१५६००-३९१००+ग्रेड वेतन ५४००) या पदाचा समावेश असल्याने सदर अस्थायी पदास दिनांक १ ऑक्टोबर, २०१८ पासून दिनांक २८ फेब्रुवारी, २०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. यासाठी होणारा खर्च “मागणी क्रमांक व्ही-२-२४२५-सहकार-००१, संचालन व प्रशासन (०१) (०४), हातमाग, यंत्रमाग व सहकारी वस्त्र निर्माण यांचे संचालनालय (२४२५ ००५८)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ. पु. क., दि.०७ सप्टेंबर, २०१८ अन्वये अस्थायी पदास मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००६१७२०११७४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pramod D. Tupe

Digitally signed by Pramod D. Tupe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Op, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=28590802f030b209e5b1d488527383f61acb2a10c00b8e9718dcbbc845a30f9b, cn=Pramod D. Tupe
Date: 2018.10.06 17:24:49 +05'30'

**( प्रमोद द. तुपे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,
२. महालेखापाल, (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,
३. सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
४. कार्यासन अधिकारी, ५-स, १२-स, १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, व्यय-२ / अर्थसंकल्प-१९ / वित्तीय सुधारणा-१/ आ.पु.क., मंत्रालय, मुंबई-३२,

६. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय,महाराष्ट्र राज्य, नागपूर,
८. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर,
९. सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण), पुणे,
१०. प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग, महाराष्ट्र राज्य, नागपूर/औरंगाबाद/सोलापूर/मुंबई,
११. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
१२. निवडनस्ती (टेक्स १ अ / ब).